कैवल्यधाम, लोणावळा या संस्थेतर्फे घेण्यात येणारे
राज्य शासकीय अधिकारी / कर्मचारी यांचे करिता
योगविद्या प्रशिक्षण शिबिरात भाग घेण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग**

**शासन निर्णय, क्रमांक : अरजा २४०४ /२/सेवा-८,**

**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक : ३ फेब्रुवारी, २००४.**

**निर्णय**

कैवल्यधाम लोणावळा, या संस्थेमार्फत लोणावळा व मुंबई येथे दहा दिवसांचे योगविद्या प्रशिक्षण शिबिर घेण्यात येते. या प्रशिक्षण केंद्रात भाग घेण्याची सवलत सर्व राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना लागू करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. आता शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

अ) कैवल्यधाम, लोणावळा, या संस्थेतर्फे घेण्यात येणारे योगविद्या प्रशिक्षणाच्या दहा दिवसांच्या शिबीरात, प्रशिक्षणासाठी प्रवेश मिळविला आहे अशा राज्य शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्याने, मागणी केल्यास त्यास, वैद्यकिय प्रमाणपत्र सादर न करता एकावेळी कमाल १४ दिवस इतकी परिवर्तीत रजा मंजूर करता येईल.

ब) वरील प्रयोजनासाठी परिवर्तीत रजा आवश्यकतेनुसार तीन वर्षातून एकदा व संपूर्ण सेवा कालावधीमध्ये कमाल सहा वेळा याप्रमाणे अनुज्ञेय राहील.

क) संबंधित कर्मचाऱ्याने रजेचे आवेदनपत्र प्रशिक्षणाच्या प्रवेशपत्राच्या झेरॉक्स प्रतीसह सादर करणे तसेच, रजेवरुन परत आल्यानंतर प्रशिक्षण पूर्ण केल्याचे संबंधित प्रशिक्षण केंद्राचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील.

ड) या प्रशिक्षणासाठीचा अपेक्षित खर्च संबंधित कर्मचाऱ्याने स्वतः सोसावयाचा आहे.

इ) सदर सवलत हक्क म्हणून मागता येणार नाही.

२. हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

३. महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील परिवर्तीत रजेसंबंधातील विद्यमान तरतुदींमध्ये या शासन निर्णयाच्या तरतुदींपुरती सुधारणा करण्यात आली आहे असे मानण्यात यावे. उपरोक्त नियमात यथावकाश रितसर सुधारणा करण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

शुभदा कारेकर
शासनाचे उपसचिव, वित्त विभाग

रोटा प्रिंट/एच-1064(18000+50-1-04)1

(कृ.मा.प.

प्रति,

महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई (८० प्रती),
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर (८० प्रती),
महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई (४० प्रती),
महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर (४० प्रती),
महालेखापाल (वाणिज्य लेखापरीक्षा), मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (४० प्रती),
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती),
मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
सर्व अपर मुख्य सचिव, प्रधान सचिव व सचिव, मंत्रालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, महाराष्ट्र राज्य, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, अपील शाखा, महाराष्ट्र राज्य, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
मुख्य लेखापरीक्षा अधिकारी, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
राज्यपालांचे सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधिकाराखाली असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली,
वित्त विभागातील सर्व कार्यासने, (ग्रंथपाल ५ प्रती),
<u>निवड नस्ती - कार्यासन सेवा-८, वित्त विभाग.</u>
* पत्राने.

---